# एक रात्र फुटपाथवरील...




सध्या शहरी वाहतुकीचा रत्नागिरीचा स्टँड १९६७ साली मुख्य असावा असे आठवते

पन्नास वर्षांपुर्वीची गोष्ट. पावसाची रिप रिप. वीज गेलेली. रात्रीचे 11 वाजून गेलेले. कुठलेच हॉटेल खायला व राहायला उघडे नाही. अशा अवस्थेत मी आणि माझा मित्र व त्याचे वडील दुसऱ्या दिवशीच्या पहाटेच्या एसटीसाठी वणवण भटकत फिरून शेवटी हाताची उशी करून फुटपाथवर उताणे पडलो होतो."... अंगावर मायेने हात फिरवणारे कोणी नाही, राहायला निवारा नाही, उद्याच्या भाकरीसाठी करायला लागणारे कष्ट करून थकलेले शरीर, कपड्याला घामाचे वास येऊन कडक झालेला सदरा अशा अवस्थेत आकाशातील तारे व चंद्र याकडे पाहून मनात काय विचार येत असतील याचा विचार करत आजची रात्र काढा...""बरं का रे शशी," मला आपल्या बोलण्यात सामावून घेताना मित्राचे वडील म्हणाले, "तुमच्यावर अशी वेळ येऊ नये, येणारही नाही पण या रात्रीची आठवण ठेवा. ज्यांच्या जवळ नाही त्यांच्या नजरेतून ज्यांच्या जवळ आहे अशा जगाला आजच्या रात्री बघा, अनुभवा. आजच्या रात्रीतील विचार तुमची जगाकडे पहायची नजर, उन्मत्त व उत्शृंखल होऊ देणार नाही. आयुष्यात काहीतरी बनायला त्यातून प्रेरणा घ्या..."

ती रात्र संपली. पहाटेच्या एसटीतून प्रवास करत आम्ही योग्य ठिकाणी पोहोचलो. आयुष्याच्या पुढल्या प्रवासात पुन्हा असे फुटपाथवर हात उशाला करून पडणे वाट्याला आले नाही. मऊ आरामदायक गाद्या व सुखवस्तू जीवनात त्या रात्रीच्या आठवण मागे पडली.

पण अचानक कुठे असे फुटपाथवरील कोणाचे देह पाहिले की त्या रात्रीचा आठवण येते

...

# काही निवडक प्रतिक्रिया

ज्यांच्या जवळ नाही त्यांच्या नजरेतून ज्यांच्या जवळ आहे अशा जगाला आजच्या रात्री बघा, अनुभवा. आजच्या रात्रीतील विचार तुमची जगाकडे पहायची नजर, उन्मत्त व उत्शृंखल होऊ देणार नाही. आयुष्यात काहीतरी बनायला त्यातून प्रेरणा घ्या..
मित्राच्या बाबांचे अनुभवी बोल आवडले....

त्या रात्री खिशात भरपूर पैसे असूनही आम्हाला असे कष्टमय जिणे वाट्याला का यावे अशी सुरवातीला आलेली मनाची चडफड शांत झाली.पण खरंच अशी वेळ का आली?...

अशी परिस्थिति का आली ?

21 Sep 2014 - 5:32 pm | *शशिकांत ओक*आ

आधीच्या प्रवासात बस बंद पडल्याने काही बाही करत रत्नागिरी ला पोहोचलो तेंव्हा शेवटची बस हुकली होती. म्हणून ती वेळ आली...

धीच्या प्रवासात बस बंद पडल्याने काही बाही करत रत्नागिरीला पोहोचलो तेंव्हा शेवटची बस हुकली होती. म्हणून ती वेळ आली..

.कोणाचेही कोकणातील दार ठोठवले तर जेवण घालायचे जमले असते? पुणेरी म्हणून हिणवले जाणाऱ्या व्यक्ति कोकणातील मुल वाले साधा पत्ता विचारला तर हुडूत्त करतात असा अनेकांचे अनुभव आहेत!...

हो.पुणेरी हिणवले जाणारे..पत्ता विचारला... वगैरे जाउंद्या. पण हो, स्टँडजवळच्या कोणीहि तुम्हाला उपाशी राहू दिले नसते. मधल्या आळीतल्या माझ्या आजी-आजोबांकडे आला असतात तर नक्किच नाहि पण ते तिथे रहात होते म्हणून त्यांचं नाव घेतलं एव्हढंच. आळीतल्या कोणाकडेहि गेला असतात तरी हाच प्रातिनिधिक अनुभव आला असता....काही प्रसंग, घटना आयुष्यात अचानक घडतात आणि काही अनुभव देवुन जातात. काही गोष्टी शिकवुन जातात.प्रत्येक गोष्टीचे विश्लेषण करत बसण्यात कधी कधी अर्थ नसतो. कारण तो अनुभव व्यक्तीसापेक्ष असतो. असो

...मला लेखकाला काय म्हणायचे आहे ते कळले नाही.मी सुद्धा एक रात्र रेल्वे फलाटावर काढली आहे ( १५ -२० वर्षा पूर्वी गुजराथ मधे पूर आला होता तेंव्हा ).बऱ्याच लोकांनी असे काहीतरी अनुभवलेच असेल. ह्या एकदम "विचारीपणाने, जिद्दीने सामोरे गेले तर ही दशा पण बदले" एव्हडे मोठे तत्वज्ञान कळण्यासारखे काय आहे? आणि एक रात्र बस, रेल्वे, विमान चुकले म्हणुन रस्त्यावर, फलाट अश्या ठीकाणी काढण्यात विषेश काय आहे?

...